जिल्हा परिषद व पंचायत समितींच्या सन १९६१ पर्यंतच्या व PRB मध्ये नोंद असलेल्या प्रशासकीय व निवासी इमारतींच्या देखभाल दुरुस्तीकरीता सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी निधी वितरीत करण्याबाबत.

लेखाशिर्ष-२०५९ ४५३१ (योजनांतर्गंत)

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः योजना-२०१८/प्र.क्र.१२२/बांधकाम-४**

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
दिनांक: **१२ फेब्रुवारी, २०१९**

वाचा :-

१) शासन परिपत्रक, वि.वि. क्र. शासन परिपत्रक वि.वि. क्र. अर्थसं २०१८/प्र.क्र.६९/ अर्थसंकल्प-३, दि.०२.०४.२०१८
२) शासन परिपत्रक, वि.वि. क्र. शासन परिपत्रक वि.वि. क्र. अर्थसं २०१८/ प्र.क्र.६९/ अर्थसंकल्प-३,दि. २५.०१.२०१९

**शासन निर्णय :-**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरीता संपूर्ण अर्थसंकल्पास मंजूरी मिळाली असून जिल्हा परिषद व पंचायत समितींच्या इमारतींच्या देखभाल दुरुस्ती साठी एकूण रू.३०.०० कोटी इतकी तरतूद अर्थसंकल्पित झालेली आहे. त्यापैकी, मंजूर तरतूदीच्या ८० टक्के मर्यादेत लेखाशिर्ष-२०५९ ४५३१ (योजनांतर्गंत) या लेखाशिर्षांतर्गत खर्च भागविण्याकरीता वित्त विभागाने रू.२४.०० कोटी इतकी तरतूद अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिली आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भीय दिनांक ०२.०४.२०१८ व दिनांक २५.०१.२०१९ च्या परिपत्रकात नमूद केल्यानुसार प्रशासकीय विभागांना दिलेल्या निधी वितरणाच्या अधिकाराच्या विहित मर्यादेच्या अधीन राहून, जिल्हा परिषद व पंचायत समितींच्या सन १९६१ पर्यंतच्या व PRB मध्ये नोंद असलेल्या प्रशासकीय व निवासी इमारतींच्या देखभाल दुरुस्तीकरीता एकूण रक्कम रू. १९,००,००,००० /- (अक्षरी रूपये एकोणीस कोटी फक्त) इतके सहायक अनुदान माहे फेब्रुवारी, २०१९ च्या कॅश-फ्लो मध्ये मंजूर करुन, खालीलप्रमाणे जिल्हा परिषदांच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या अधिनस्त ठेवण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

३. यापुर्वी सार्वजनिक बांधकाम विभागाकडून कामे मंजूरीबाबत जी कार्यपध्दती अवलंबिण्यात येत होती, तीच कार्यपध्दती अवलंबून कामे मंजूर करण्यात यावीत. इमारती देखभाल दुरुस्ती संदर्भात

सार्वजनिक बांधकाम विभागाने विहीत केलेले नियम व मार्गदर्शक सूचनांचे पालन करुन कामे करण्यात यावीत. तसेच, दुरुस्ती पुर्वीचे व नंतरचे फोटो जतन करुन ठेवण्यात यावेत.

४. मंजूर कामाचे तुकडे न पाडता आवश्यकतेनुसार ई-निविदा कार्यपध्दतीचा अवलंब करुन कामाचे आदेश देणे आवश्यक राहील.

-: निधी वितरणाचे विवरणपत्र :-

| लेखाशिर्ष - २०५९ ४५३१ खाली जिल्हा परिषद व पंचायत समिती इमारतींच्या दुरुस्तीसाठी वितरीत करण्यात आलेला निधी | | |
|---|---|---|
| अ.क्र. | जिल्ह्याचे नाव | वितरीत करण्यात आलेला निधी (रु लक्ष मध्ये) |
| १ | २ | ३ |
| १. | ठाणे | १४०.४५ |
| २. | पालघर | १५.९५ |
| ३. | रायगड | १०.२४ |
| ४. | रत्नागिरी | ५४.५९ |
| ५. | सिंधुदुर्ग | १०.४१ |
| ६. | नाशिक | १०.६६ |
| ७. | धुळे | १५०.७१ |
| ८. | जळगाव | ९०.२७ |
| ९. | अहमदनगर | ८१.३० |
| १०. | पुणे | ६९.४८ |
| ११. | सातारा | ७३.०० |
| १२. | सांगली | १३.४० |
| १३. | सोलापूर | ३२.३६ |
| १४. | कोल्हापूर | ७७.३२ |
| १५. | औरंगाबाद | ३५.८० |
| १६. | जालना | ४३.५४ |
| १७. | परभणी | ५५.९७ |
| १८. | हिंगोली | १०.३९ |
| १९. | बीड | १६६.५४ |
| २०. | उस्मानाबाद | ११८.३७ |

| अ.क्र. | जिल्ह्याचे नाव | वितरीत करण्यात आलेला निधी (रु लक्ष मध्ये ) |
|---|---|---|
| २१. | लातूर | १०६.१५ |
| २२. | बुलढाणा | १५१.३४ |
| २३. | अकोला | ४२.२६ |
| २४. | वाशिम | ४५.३० |
| २५. | अमरावती | १२४.५४ |
| २६. | यवतमाळ | १२.२४ |
| २७. | वर्धा | ३१.१२ |
| २८. | नागपूर | २५.०० |
| २९. | भंडारा | १०.६१ |
| ३०. | गोंदिया | ५१.५९ |
| ३१. | चंद्रपूर | २८.९४ |
| ३२. | गडचिरोली | १०.१६ |
| | एकूण | १९००.०० |

५. या कामांकरीता होणारा खर्च मागणी क्र. एल-३ "२०५९, सार्वजनिक बांधकामे, ८०-सर्वसाधारण, १९६ जिल्हा परिषदा/जिल्हा स्तरीय पंचायत समितींना सहाय्य (०१) स्थानिक (स्तर) क्षेत्रातील योजना, (०१) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १८२ अन्वये इमारतींच्या दुरुस्तीसाठी जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदान, २७ लहान बांधकामे, (२०५९ ४५३१) (योजनांतर्गत)" या लेखाशिर्षा खाली खर्ची टाकावा व सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठीसाठी करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. वरीलप्रमाणे ज्या कामाच्या प्रयोजनार्थ निधी उपलब्ध करुन दिलेला आहे, तो त्याच कामावर तात्काळ खर्च करुन, सदर सहाय्यक अनुदानाच्या विनियोजना संबंधीचे उपयोगिता प्रमाणपत्रे, महालेखापाल, संबंधीत विभागीय आयुक्त यांना पाठवून त्याची प्रत या विभागाकडे आठ दिवसांत पाठविण्याची जबाबदारी संबधित मुख्य वित्त व लेखाअधिकारी, जिल्हा परिषद यांची राहील. तसेच सदर अनुदानाच्या विनियोजना संबधी महालेखापाल कार्यालयास पाठविण्यात आलेल्या उपयोगिता प्रमाणपत्राची प्रत तसेच, संबंधित जिल्हा परिषदेने कोण-कोणत्या कामावर निधी खर्च केला याचा

तपशिल शासनास विहीत मुदतीत पाठविण्यात न आल्यास पुढील सहायक अनुदान वितरीत केले जाणार नाही, याची कृपया नोंद घ्यावी.

७. प्रस्तुतचा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक वि.वि. क्र. अर्थसं २०१८/प्र.क्र.६९/ अर्थसंकल्प-३, दि.०२.०४.२०१८ व शासन परिपत्रक क्रमांक क्र. अर्थसं २०१८/प्र.क्र.६९/ अर्थसंकल्प-३, दि. २५.०१.२०१९ मधील अटी-शर्तीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१९०२१२१०१७२८३८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e461e0a32ec649f0a60e4372f7cbbb3edff433d33cc0d95db6f8dbf1fa4f7f, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2019.02.12 10:30:31 +05'30'

( दि.बा.पाटील )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद
२. मा. सचिव (बांधकामे) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय मुंबई ४०० ०३२
३. विभागीय आयुक्त,( सर्व )
४. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा, महाराष्ट्र - १ मुंबई / महाराष्ट्र - २, नागपूर.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
६. सर्व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ
७. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
८. कार्यकारी अभियंता (बांधकाम) जिल्हा परिषद, (सर्व)
९. जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व)
१०. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा , (सर्व)
११. उपमुख्य लेखा परिक्षक, जिल्हा , (सर्व)
१२. वित्त विभाग (व्यय- १५ , अर्थ-३) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१३. कार्यासन अधिकारी- वित्त-१, वित्त-७ ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन २५ मर्झबान पथ फोर्ट मुंबई-४०० ००१
१४. निवडनस्ती- बांधकाम-४ ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन मर्झबान पथ फोर्ट, मुंबई-४०० ००१